प्रति किलोस रु. १५०/- पेक्षा कमी किंमतीने विकण्यात येणा-या जर्दा, तंबाखू वरील ऐषआराम कर आकारणीबाबत...

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
शासन निर्णय क्रमांक-एलटीसी-१८९५/प्रक्र. ७५/कराधान-१.
दिनांक:- १९ ऑगस्ट १९९८.

प्रस्तावना:-

महाराष्ट्र ऐषआरामकर अधिनियम, १९८७ च्या कलम-३ [१] अन्वये दिनांक १ मे १९९३ पासून राज्यातील सर्व तंबाखू व तंबाखू उत्पादने यावर १० टक्के दराने ऐषआराम कर लागू करण्यात आलेला होता. तदनंतर तंबाखू व तंबाखू उत्पादने यावरील ऐषआराम कर दिनांक ७.९.१९९४ पासून रद्द करण्यात आला व पुन्हा दिनांक १.१०.१९९५ पासून प्रक्रिया न केलेल्या तंबाखू व विडी या गरीब समाजातील वस्तुला वगळण्यात येऊन इतर तंबाखू व तंबाखू उत्पादने यावरील ५ टक्के ऐषआराम कर लागू करण्यात आला. दिनांक ४.९.१९९६ पासून रु. १५०/- प्रति किलो जर्दा तंबाखूवरील कर सुध्दा माफ करण्यात आला. साहजिकच त्यामुळे दिनांक १.१०.१९९५ ते दिनांक ३.९.१९९६ या कालावधीकरिता रु. १५०/- प्रति किलो विकल्या जाणा-या जर्दा तंबाखूवर ५ टक्के ऐषआराम कर लागू राहीला.

२. यासंबंधी संबंधितांकडून प्राप्त झालेल्या अर्जास अनुलक्षून शासन पत्र दिनांक ८ मार्च १९९८ अन्वये ऐषआराम कर अधिनियम, १९८७ खाली जे करदाते तंबाखूवर कर भरण्यास पात्र आहेत त्यांनी दिनांक १ ऑक्टोबर, १९९५ ते दिनांक ३ सप्टेंबर १९९६ या काळात जरी रु. १५०/- प्रति किलो पेक्षा कमी किंमतीस तंबाखू [जर्दा, तपकीर इत्यादी] विकला असेल व कर गोळा केला नसेल तर त्यांच्याकडून ऐषआराम कराची वसूली करण्यास पुढील आदेश प्राप्त होईपर्यन्त स्थगिती देण्यात आली होती. आता शासनाने दिनांक १.१०.१९९५ ते दिनांक ३.९.१९९६ या कालावधीसाठी कर वसूली संबंधी पुढीलप्रमाणे प्रशासकीय सवलत देण्याचा निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय:-

खालील अटींची पूर्तता केल्यास दिनांक १.१०.१९९५ ते दिनांक ३.९.१९९६ या कालावधीत प्रति किलो रु. १५०/- पेक्षा कमी तंबाखू विकणा-या व्यापा-यांना प्रत्यक्ष वित्तीय सवलत मंजूर करण्यात येत आहे.

[१] ज्या करदात्यांनी दिनांक १ ऑक्टोबर १९९५ ते दिनांक ३ सप्टेंबर १९९६ या कालावधीमध्ये कर गोळा केला नाही, फक्त त्या प्रकरणांत प्रशासकीय सवलत मंजूर करावी.

[२] ज्या करदात्यांनी केंद्रीय अबकारी कराच्या आकारणीच्या वेळी ऐषआरामकराची वजावट घेतली असेल तर त्याने ऐषआरामकर गोळा केला आहे असे समजावे, तसेच जर करदात्याने बिजकामध्ये [विक्री बील ] अथवा वेगळया डेबिट नोटच्या सहाय्याने कराची रक्कम गोळा केली असेल तर त्याने कर गोळा केला असे समजावे.

...२

[३] ही सवलत तंबाखूचे जे प्रकार वजनावर विकण्यात येतात, उदा• [जर्दा, तपकीर, मिश्री इत्यादि]त्यांच्या बाबतीत दिली जाईल व वस्तुंची ग्राहकांसाठी किंमत प्रति किलो रु• १५० पेक्षा कमी असेल तरच उपलब्ध होईल•

[४] प्रशासकीय सवलत दिल्यामुळे कोणत्याही प्रकरणात परतावा द्यावा लागू नये•

प्रशासकीय सहाय्य मंजूर करणारी यंत्रणा:-

या शासन निर्णयानुसार प्रशासकीय सवलत मंजूर करण्याचे अधिकार विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना देण्यात येत असून आवश्यकतेनुसार सदर अधिकार आयुक्तांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील, अपर विक्रीकर आयुक्त, विक्रीकर उपायुक्त [प्रशासन] सहायक विक्रीकर आयुक्त [प्रशासन] यांना अथवा त्या दर्जाखालील इतर संबंधित अधिका-यांना हे अधिकार प्रदान करण्याची परवानगी विक्रीकर आयुक्तांना देण्यात येत आहे•

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ अ• गो• देशमुख]
शासनाचे उप सचिव

प्रति,

१] विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०० ०१०[४० प्रती]•
२] अपर विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०००१०•
३] महालेखापाल [लेखा परीक्षा]-१, मुंबई•
४] महालेखापाल [लेखा परीक्षा]-२, नागपूर•
५] संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई•
६] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई•
७] निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई•
८] निवड नस्ती, कराधान-१•